जागतिक बँक सहाय्यिता महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पांतर्गत कृषि सहाय्यता सेवा घटकाच्या अंमलबजावणीसाठी सन २०१४-१५ मधील निधीस वित्तीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः जसुप्र ५४१३/प्र.क्र.२०८/३ अे

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२
तारीख: १७ ऑक्टोबर , २०१४

**संदर्भ :- शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**१)** जसुप्र- ५४०५/ प्र.क्र.१४४/३ अे, दिनांक ७ डिसेंबर, २००५

**२)** जलसंपदा विभाग ज्ञापन क्रमांक बीजीएम-१०.११(२२८/२०११) अर्थ-१(एक) दिनांक १९मे,२०११

**३)** कृषि व पदुम विभाग शासन निर्णय जसुप्र-५४१३/प्र.क्र.२०८/३-अे, दि.९ जून, २०१४.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र जलसुधार प्रकल्पातंर्गत कृषि सहाय्यता सेवा घटक कार्यक्रम या प्रकल्पास दि.३०.९.२०१४ पर्यंत मुदत वाढ जलसंपदा विभागाने दिली होती. प्रस्तुत सहा महिन्याच्या कालावधीसाठी खर्च भागविण्यासाठी ०२८- व्यवसायिक सेवा या बाबीखाली जलसंपदा विभागाने रु.३१.०० लक्ष इतके अनुदान कृषि विभागास बीडीएस वर उपलब्ध करुन दिले आहेत. सदर निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

वित्त विभागाने सन २०१४-१५ मध्ये अर्थसंकल्पास मंजुरी मिळे पर्यत एप्रिल ते जुलै २०१४ या चार महिन्याचा खर्च भागविण्यासाठी महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदाना) व्दारे रु.३८.१५ लक्ष इतका निधी उपलब्ध करुन दिला त्यास शासन दिनांक ९ जून, २०१४ अनन्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

***शासन निर्णय-***

१) संदर्भाधीन दिनांक ७ डिसेंबर,२००५ च्या शासन निर्णया दिलेल्या तपशीलानुसार कृषि विभागामार्फत ९ मोठे पाटबंधारे प्रकल्प, १३ मध्यम पाटबंधारे प्रकल्प, ४४ लघु पाटबंधारे प्रकल्प अशा राज्यातील ३३ जिल्हयांतील एकूण ६६ प्रकल्पांच्या क्षेत्रात कृषि सहाय्यता सेवा (Agriculture Support Services) घटकाची अंमलबजावणी राज्यातील सर्व ३३ जिल्हयांत करण्यात येत आहे. संदर्भाधिन दिनांक ७ डिसेंबर,२००५ व दिनांक १९ जुलै,२००६ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार अंमलबजावणीची नियोजित उद्दिष्टे व उपक्रम / कार्यक्रम आणि घटक राहतील.

२) जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पांतर्गत कृषि सहाय्यता सेवा घटकाच्या सन २०१४-१५ मधील अंमलबजावणीकरिता रु. ३१.०० लक्ष (रुपये एकत्तीस लक्ष फक्त)

निधी जलसंपदा विभागाकडून कृषि विभागाकडे कृषि सहाय्यता सेवा घटकातील व्यवसायीक सेवा या घटकाच्या अंमलबजावणीसाठी मंजूर करण्यास शासन वित्तीय मान्यता देत

आहे. प्रस्तुत मंजुर निधी रुपये ३१.०० लक्ष (रु. एकत्तीस लक्ष फक्त) निधी जलसंपदा विभागाच्या खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षकाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक आय- ३
२७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे (योजनांतर्गत)
(८०) सर्वसाधारण
(८००) इतर खर्च (११) महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प
(११) (०१) जागतिक बॅक सहाय्यिता जलक्षेत्र सुधार प्रकल्प
(२७०१-बी-०७३)

**३)** वरील रुपये रु. ३१.०० लक्ष (रुपये एकत्तीस लक्ष फक्त) एवढया निधीचा विनियोग करण्यासाठी तसेच संबंधित यंत्रणांना आवश्यकतेनुसार निधी वितरीत करण्यासाठी राज्यस्तरावर संचालक (आत्मा) तथा नोडल अधिकारी महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे विभागीय स्तरावर विभागीय कृषि सहसंचालक व जिल्हास्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत असून वरील अधिकारी व तालुका स्तरावर तालुका कृषि अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना प्राधिकृत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. संचालक (आत्मा) तथा नोडल अधिकारी, महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प यांनी कृषि सहाय्यता सेवा घटकाच्या अंमलबजावणीचा तपशील आणि निधी वापर तथा खर्च यासाठी सर्व संबंधित यंत्रणांना तपशीलवार मार्गदर्शक सुचना निर्गमित कराव्यात.

अ) वितरीत करण्यास येत असलेला निधी हा जागतिक बॅंकेतर्फे मान्य असलेल्या बाबींवर व बॅंकेने प्रस्तावित केलेल्या पध्दतीने खर्च करणे बंधनकारक असल्याने इतर बाबींवर सदर निधी खर्च करु नये.

ब) कोणत्याही नियंत्रक अधिकाऱ्याने त्यांना वितरीत करण्यात येत असलेल्या निधीमध्ये त्यांचे स्तरावर अंतर्गत फेरबदल करु नयेत.

क) नियंत्रक अधिकाऱ्याने विनियोजन लेख्याच्या पूर्तीसाठी निधी वापराबाबतचे प्रमाणपत्र ( Utilization Certificate ) अधिक्षक अभियंता, प्रकल्प तयारी व व्यवस्थापन कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे.

प्रस्तुत शासन निर्णय मा.अपर मुख्य सचिव (कृषि व फलोत्पादन) यांच्या मान्यतेने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतास्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४१०१७१६३९५०८४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Borkar Vidyadhar M

Digitally signed by Borkar Vidyadhar M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Borkar Vidyadhar M
Date: 2014.10.17 16:52:55 +05'30'

**( वि.म.बोरकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. कुलगुरु, सर्व कृषि विद्यापीठ
२. सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सर्व विभागीय आयुक्त
४. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे(५ जादा प्रतीसह)
५. सर्व जिल्हाधिकारी
६. सर्व विधानमंडळ सदस्य/ १० प्रति विधानमंडळ ग्रंथालय
७. सर्व जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अधिक्षक अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. अधिक्षक अभियंता, प्रकल्प तयारी व व्यवस्थापन कक्ष, मजसुप्र, जलसंपदा विभाग
१२. संचालक (आत्मा) तथा नोडल अधिकारी कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य ,पुणे (पाच जादा प्रतीसह)
१३.संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
१४.सर्व संचालक/कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१६.सर्व जिल्हयांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१७. सर्व जिल्हयांचे प्रकल्प संचालक, आत्मा
१८.निवड नस्ती.